**जनहित याचिका क्र. २८/२०१३ मध्ये मा. उच्च न्यायालय यांचे दि. १८.०२.२०१६ च्या आदेशान्वये योग्यता प्रमाणपत्र देतानाच्या चाचणीचे व्हिडीओ रेकॉर्डिंगबाबत झालेल्या खर्चास मान्यता देणे.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: एमव्हीडी-१०२१/प्र.क्र.२९७/परि-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ३२.

दिनांक : २३ फेब्रुवारी, २०२३.

<u>वाचा</u> : -

१) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. पआका/ कार्या १०/ कोल्हापूर ब्रेक टेस्ट ट्रॅक/ सी.सी.टी.व्ही./ २०२१ जा.क्र.११३७६, दि.०७.०९.२०२१, जा.क्र. १३३१४/ दिनांक २९.११.२०२२.

२) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. पआका/ कार्या १०/ कोल्हापूर ब्रेक टेस्ट ट्रॅक/ सी.सी.टी.व्ही./ २०२३/ जा.क्र.९५७, दिनांक १९.०१.२०२३.

**<u>प्रस्तावना :-</u>**

जनहित याचिका क्र. २८/२०१३ मध्ये मा. उच्च न्यायालय यांचे दि. १८.०२.२०१६ आदेश विचारात घेता, उपर्निर्दिष्ट क्र. १ व २ येथील परिवहन आयुक्त कार्यालयाच्या प्रस्तावानुसार प्रादेशिक परिवहन कार्यालय, कोल्हापूर येथे ब्रेक टेस्ट ट्रॅकवरील परिवहन संवर्गातील वाहनांचे तपासणीकरीता भाडेतत्त्वावर घेतलेल्या व्हिडीओ रेकॉर्डींग यंत्रणेवरील खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

जनहित याचिका क्र. २८/२०१३ मध्ये मा. उच्च न्यायालय यांचे दि. १८.०२.२०१६ आदेश विचारात घेता, प्रादेशिक परिवहन कार्यालय, कोल्हापूर येथे ब्रेक टेस्ट ट्रॅकवरील परिवहन संवर्गातील वाहनांचे तपासणीकरीता भाडेतत्त्वावर घेतलेल्या व्हिडीओ रेकॉर्डींग यंत्रणेवरील झालेला खर्च रु.४,६४,७७२/- (अक्षरी रुपये चार लक्ष चौसष्ठ हजार सातशे बहात्तर फक्त) अदा करण्यास याद्वारे कार्योत्तर मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी येणारा खर्च "मागणी क्र. बी-३, २०४१ वाहनांवरील कर, (०२) प्रादेशिक कार्यालय, (०२) (०१) प्रादेशिक कार्यालय दत्तमत (अनिवार्य) (२०४१ ००३६) १३-कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता उपलब्ध होणाऱ्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, सुधारित वित्तीय नियम पुस्तिका, १९७८ शासन निर्णय क्र. विस-विक्र.विअक्र २०१३/प्र.क्र.३०/ २०१३/विनियम, दि. १७/०४/२०१५, उपविभाग-२, अ.क्र.१, नियम क्र.२ व ७ अन्वये मध्ये दर्शविलेल्या आकस्मिक खर्चास मंजुरी देणे (महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम १९६५ मधील नियम १९, परिशिष्ट ४ मधील आकस्मिक खर्च यादी) यादी मधील अनु. क्र. १० (कार्यालयीन कामकाजासाठी उद्भवणारा अन्य आकस्मिक खर्च) नुसार प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०२२३१५१४०००८२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LANGHI BHARAT R

Digitally signed by LANGHI BHARAT R
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, pseudonym=B2922612E606733B1ABC8BE253ADA57B2D4704C4, serialNumber=49CE1A18F73B9A20908SE92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=LANGHI BHARAT R
Date: 2023.02.23 15:18:10 +05'30'

**( भरत रा. लांघी )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई /नागपूर.
२) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) परिवहन उप आयुक्त (प्रशासन/निरीक्षण/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई.
४) प्रादेशिक परिवहन अधिकारी, कोल्हापूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर.
६) कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवडनस्ती (परि-४).